अर्थसंकल्पिय अनुदान सन २०२३-२४
"२२१५ पाणीपुरवठा व स्वच्छता ०१, पाणीपुरवठा ००१, संचालक व प्रशासन (०१) (०१) पाणीपुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय / उप विभागीय आस्थापना (अनिवार्य) ( २२१५१८४३)"
मागणी क्रमांक वाय -२

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बजेट-१४२३/प्र.क्र.९५/पापु-२३

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४००००१
तारीख : ११ मे, २०२३

**वाचा :-**

१. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकः अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२ एप्रिल, २०२३
२. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः बजेट-१४२३/प्र.क्र.९५/पापु-२३, दि. १८ एप्रिल, २०२३

**प्रस्तावना :-**

जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या आस्थापनेवरील वर्ग १ व वर्ग २ संवर्गातील अधिका-यांचे वेतनखर्च भागविण्यासाठी मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता ०१, पाणीपुरवठा ००१, संचालन व प्रशासन (०१)(०१) पाणीपुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय / उप विभागीय आस्थापना (२२१५ १८४३)" या लेखाशिर्षाखाली वित्तीय वर्ष सन २०२३-२४ करिता ०१, वेतन साठी एकूण रुपये ५५.८९६३ कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत केलेला आहे. त्यापैकी वित्त विभागाने अर्थसंकल्पीय संनियंत्रण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेला रु.५.०० कोटी इतका निधी जिल्हा परिषदांना वाचा मधील अनुक्रमांक २ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. आता जिल्हा परिषदांना पुढील वेतन अनुदान वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन विचाराधीन आहे.

## शासन निर्णय:-

सन २०२३-२४ या वित्तीय वर्षासाठी “२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता ०१, पाणीपुरवठा ००१, संचालन व प्रशासन (०१)(०१) पाणीपुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय / उप विभागीय आस्थापना (अनिवार्य) (२२१५ १८४३)” या लेखाशिर्षाखाली जिल्हा परिषद ग्रामीण पाणी पुरवठा विभागाच्या आस्थापनेवरील वर्ग १ व वर्ग २ च्या अधिका-यांचे वेतन खर्च भागविण्यासाठी या शासन निर्णयासोबतच्या “विवरणपत्र अ” मध्ये दर्शविल्यानुसार एकूण रुपये ५,९३,००,०००/- (अक्षरी रुपये पाच कोटी त्र्याण्णव लाख फक्त ) इतके अनुदान संबंधित जिल्हा परिषदेच्या मुख्य लेखा व वित्त अधिकारी यांना मंजूर करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेले अनुदान शासनाने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहील. या शासन निर्णयासोबतच्या “विवरणपत्र अ” मध्ये दर्शविण्यात आलेल्या रकमांपेक्षा अधिक खर्च होणार नाही याची दक्षता सर्व संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी. तसेच सदर निधी ज्या प्रयोजनासाठी आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल याचीही दक्षता घेण्यात यावी.

३. सदर शासन निर्णयान्वये तसेच यापूर्वी वितरित केलेल्या निधीची उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर केल्याची खात्री करुनच पुढील आवश्यक निधीची मागणी करण्याची दक्षता घेण्यात यावी. पुढील मागणीपत्र प्राप्त झाल्याशिवाय निधी वितरीत केला जाणार नाही याची संबंधित जिल्हा परिषदांनी नोंद घ्यावी. तसेच झालेल्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयाने नोंदविलेल्या खर्चाशी वेळोवेळी ताळमेळ घ्यावा. ताळमेळाचे काम प्रलंबित असल्यास पुढील निधी वितरीत करण्यात येणार नाही. शासनाद्वारे देण्यात येणारे अनुदान लाभार्थ्यांच्या बँक अकाऊंटमध्ये ECS द्वारे प्रदान करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची रक्कम एकत्रितरित्या व Offline पद्धतीने वितरीत करण्यात येऊ नये.

४. वितरीत केलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी / शर्तींचे पालन करावे.

५. या शासन निर्णयाव्दारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून होणारा खर्च मागणी क्रमांक वाय-२ “ २२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता ०१, पाणीपुरवठा ००१, संचालन व प्रशासन (०१) (०१) पाणीपुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय / उप विभागीय आस्थापना (अनिवार्य) (२२१५१८४३) ०१, वेतन ” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२३-२४ या वित्तीय वर्षासाठी मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक अर्थसं-२०२३/प्र.क्र.४३/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ अन्वये विभागांना दिलेल्या अधिकारात तसेच बीम्स प्रणालीवर उपलब्ध केलेल्या निधीच्या मर्यादेत सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहेत. या परिपत्रकान्वये नमूद केलेल्या अटी व शर्तीची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५१११६५४४७९५२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BALASAHEB BABASAHEB HAJARE

Digitally signed by BALASAHEB BABASAHEB HAJARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, pseudonym=ECB735300543A776F1DE714D85AF521F7953EAF5, serialNumber=0EDD9C3872935C071332E1F94CBCDC9828471B3251EEE2D5C23FD681EC41CEFA, cn=BALASAHEB BABASAHEB HAJARE
Date: 2023.05.11 17:55:00 +05'30'

**( बाळासाहेब बा. हजारे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. विधानसभा / विधान परिषद सदस्य, सर्व
२. विभागीय आयुक्त, सर्व
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
४. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सर्व
५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा व अनुज्ञेयता)
६. महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई (लेखा परिक्षा)
७. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा व अनुज्ञेयता)
८. महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर (लेखा परिक्षा)
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी

१०.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
११.अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखाधिकारी कार्यालय, वांद्रे, मुंबई
१२.कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (व्यय-३ व अर्थ-१८)
१३.कार्यासन पापु-०४ व पापु-२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
१४.निवड नस्ती कार्यासन पापु-२३

# विवरणपत्र-अ

शासन निर्णय क्रमांक बजेट-१४२३/प्र.क्र.९५/पापु-२३, दिनांक ११ मे, २०२३ सोबतचे सहपत्र

| मागणी क्रमांक वाय-२ "२२१५, पाणीपुरवठा व स्वच्छता ०१, पाणीपुरवठा ००१, संचालक व प्रशासन (०१)(०१) पाणीपुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी विभागीय / उप विभागीय आस्थापना (२२१५१८४३)" | | | |
|---|---|---|---|
| अ. क्र. | जिल्हा परिषद | सन २०२३-२४ करीता या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाचे अनुदान ०१, वेतन | या शासन निर्णयान्वये लेखाशीर्ष २२१५१८४३ खाली वितरीत करण्यात येत असलेली एकूण रक्कम (अक्षरी रुपये) |
| १ | २ | ३ | ४ |
| १ | ठाणे | १५००००० | रूपये पंधरा लाख फक्त |
| २ | पालघर | १२००००० | रूपये बारा लाख फक्त |
| ३ | रायगड | १०००००० | रूपये दहा लाख फक्त |
| ४ | रत्नागिरी | १३००००० | रूपये तेरा लाख फक्त |
| ५ | सिंधुदुर्ग | १०००००० | रूपये दहा लाख फक्त |
| ६ | नाशिक | १६००००० | रूपये सोळा लाख फक्त |
| ७ | धुळे | १३००००० | रूपये तेरा लाख फक्त |
| ८ | नंदुरबार | १६००००० | रूपये सोळा लाख फक्त |
| ९ | जळगांव | १४००००० | रूपये चौदा लाख फक्त |
| १० | अहमदनगर | १०००००० | रूपये दहा लाख फक्त |
| ११ | पुणे | २८००००० | रूपये अठ्ठावीस लाख फक्त |
| १२ | सातारा | २२००००० | रूपये बावीस लाख फक्त |
| १३ | सांगली | १७००००० | रूपये सतरा लाख फक्त |
| १४ | सोलापूर | १६००००० | रूपये सोळा लाख फक्त |
| १५ | कोल्हापूर | २७००००० | रूपये सत्तावीस लाख फक्त |
| १६ | औरंगाबाद | १८००००० | रूपये अठरा लाख फक्त |
| १७ | जालना | ११००००० | रूपये अकरा लाख फक्त |
| १८ | परभणी | १२००००० | रूपये बारा लाख फक्त |
| १९ | हिंगोली | १०००००० | रूपये दहा लाख फक्त |
| २० | बीड | १२००००० | रूपये बारा लाख फक्त |
| २१ | नांदेड | २०००००० | रूपये वीस लाख फक्त |
| २२ | उस्मानाबाद | ३०००००० | रूपये तीस लाख फक्त |

| | | | |
|---|---|---|---|
| २३ | लातूर | २४००००० | रूपये चोवीस लाख फक्त |
| २४ | बुलढाणा | १४००००० | रूपये चौदा लाख फक्त |
| २५ | अ्कोला | १०००००० | रूपये दहा लाख फक्त |
| २६ | वाशिम | ११००००० | रूपये अकरा लाख फक्त |
| २७ | अमरावती | ४०००००० | रूपये चाळीस लाख फक्त |
| २८ | यवतमाळ | २०००००० | रूपये वीस लाख फक्त |
| २९ | वर्धा | १०००००० | रूपये दहा लाख फक्त |
| ३० | नागपूर | ५०००००० | रूपये पन्नास लाख फक्त |
| ३१ | भंडारा | २५००००० | रूपये पंचवीस लाख फक्त |
| ३२ | गोंदिया | ११००००० | रूपये अकरा लाख फक्त |
| ३३ | चंद्रपूर | १३००००० | रूपये तेरा लाख फक्त |
| ३४ | गडचिरोली | १३००००० | रूपये तेरा लाख फक्त |
| एकूण | | ५९३००००० | रूपये पाच कोटी त्र्याण्णव लाख फक्त |

BALASAHEB BABASAHEB HAJARE

Digitally signed by BALASAHEB BABASAHEB HAJARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=49ad4eefa4101394c1b1119b5f2d93940a592bd8a91d2970b24702e05968e19f, pseudonym=ECB735300543A776F1DE714D85AF521F7953EAF5, serialNumber=0EDD9C3872935C071332E1F94CBCDC9828471B3251EEE2D5C23FD681EC41CEFA, cn=BALASAHEB BABASAHEB HAJARE
Date: 2023.05.11 17:55:41 +05'30'

( बाळासाहेब बा. हजारे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन